**इंटरनॅशनल फंड फॉर ॲग्रीकल्चरल डेव्हलपमेंट सहाय्यीत समन्वित कृषि विकास प्रकल्पाकरिता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -बासप्र-२००९/प्रक्र.८८ /२१स**
**मंत्रालय विस्तार,मुंबई-४०००३२**
**दिनांक :३०.०१.२०१०.**

**वाचा - १. शासन निर्णय क्र. कृबास-२००७/प्रक्र.८५/११-स,दि.१९ जून, २००८.**
**२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाचे शासन पत्र क्र. पूरक १००८/प्र.क्र.६६/१७-स, दि. ०६.०७.२००९.**
**३. शासन निर्णय समक्रमांक दि. २८.०७.२००९.**
**४. पणन संचालक, पुणे यांचे पत्र क्र. पणन-५/कृउबास/कृपम/प्रकल्प/४२६५/२०१०, दिनांक ८/१/२०१०.**

**प्रस्तावना-**

इंटरनॅशनल फंड फॉर ॲग्रीकल्चरल डेव्हलपमेंट या युनो अंतर्गत संस्थेच्या सहकार्याने विदर्भातील शेतक-यांच्या आत्महत्यांनी ग्रस्त असलेल्या सहा जिल्हयातील शेतक-यांना दिलासा देण्याकरीता राज्य शासन कृषि क्षेत्रातील सर्व योजनांमध्ये समन्वय साधुन कृषि विकासावर आधारीत समन्वयीत कृषि विकास प्रकल्प (C-AIM) राबविण्यात येत आहे. ४ डिसेंबर, २००९ पासून या प्रकल्पाकरीता IFAD कडून कर्ज उपलब्ध झालेले आहे. या प्रकल्पाकरीता सन २००९-१० मधील माहे डिसेंबर २००९ ते मार्च, २०१० करीता विभागीय प्रकल्प सुकाणू समितीने मंजूर केलेल्या वार्षिक कार्य नियोजन व अंदाजपत्रकाच्या (AWPB) अनुषंगाने प्रकल्प व्यवस्थापन यंत्रणा, अमरावती यांचेमार्फत प्राप्त झालेल्या प्रस्तावातील प्रकल्प व्यवस्थापन व प्रकल्पामध्ये हाती घ्यावयाच्या इतर कामांकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

१. या शासन निर्णयाव्दारे संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक २८/७/२००९ रोजीचा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

२.	राज्यात समन्वित कृषि विकास प्रकल्प राबविण्याकरिता येणा-या खर्चाकरीता महाराष्ट्र कृषि पणन मंडळास सन २००९-१० करीता एकूण रु. ३२० लाखापैकी रु. १०० लाख रज्य शासनाच्या हिश्यातुन व रु. २२० लाख केंद्र शासनाच्या हिश्यातुन उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

३.	सदर रक्कम कृषि पणन मंडळाला वितरीत करण्यासाठी सहसंचालक (पणन), पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून व लेखाधिकारी, पणन संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून शासनाच्यावतीने प्राधिकृत करण्यात येत आहे. पणन संचालनालयाने सदर रक्कम शासकीय कोषागारातून महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांना वितरीत करुन त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

४.	या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या निधीचा विनियोग ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे, त्याच कारणासाठी करत असल्याबाबत पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी खात्री करावी आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

५.	राज्य शासनाच्या या प्रकल्पातील वाटयाकरिता रु. १०० लाख इतका निधी पुढील लेखाशिर्षाखाली माहे डिसेंबर, २००९ ते मार्च, २०१० साठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

मागणी क्र. व्ही-५,
मुख्य लेखाशीर्ष ६४२५, सहकारासाठी कर्जे
(००)(१०८), इतर सहकारी संस्थांना कर्जे
(०१)(१६), ॲग्रीकल्चर डेव्हलपमेंट प्रोजेक्ट फॉर डिस्ट्रेस्ड डिस्ट्रीक्टस ऑफ विदर्भ
५५, कर्ज व आगाऊ रकमा
(६४२५-०६४-५ दत्तमत)

६.	या प्रकल्पातील केंद्र शासनाच्या वाटयाकरिता रु. २२० लाख इतका निधी पुढील लेखाशिर्षाखाली माहे डिसेंबर, २००९ ते मार्च, २०१० साठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

मागणी क्र. व्ही-५,
मुख्य लेखाशीर्ष ६४२५, सहकारासाठी कर्जे
(००)(१०८), इतर सहकारी संस्थांना कर्जे
(०१)(१९), ॲग्रीकल्चर डेव्हलपमेंट प्रोजेक्ट फॉर डिस्ट्रेस्ड डिस्ट्रीक्टस ऑफ विदर्भ
५५, कर्ज व आगाऊ रकमा
(६४२५-०६६-३ दत्तमत)

७.	हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २९१/२००९/व्यय-२, दि.२९.०५.२००९ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८.  सदर शासन निर्णय शासनाच्या बेवसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०१००१३०१३५७२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(डॉ. सुधीर कुमार गोयल)
प्रधान सचिव (सहकार व पणन)

प्रति,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१,(लेखा व अनुज्ञेयता)(लेखापरीक्षा),मुंबई
२. महालेखापाल,महाराष्ट्र-२,(लेखा व अनुज्ञेयता)(लेखापरीक्षा),नागपूर
३.सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे
४. पणन संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ प्रती)
५. प्रकल्प संचालक (C-AIM) तथा अतिरिक्त विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
६.प्रकल्प अग्रणी यंत्रणा (C-AIM), महाराष्ट्र कृषि पणन मंडळ, पुणे.
७. सहसंचालक लेखा व कोषागारे ,संगणक कक्ष,५ वा मजला,नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर,मुंबई ४०००३२
८. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे (३ प्रती)
९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१०.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग (व्यय-२/शासन हमी/अर्थसंकल्प-१३),मंत्रालय,मुंबई
१२. कक्ष अधिकारी १७-स,सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
१३. कक्ष अधिकारी (संगणक कक्ष),सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
१४. निवड नस्ती